**सार्वजनिक बांधकाम विभागाअंतर्गत बांधावयाच्या रस्ते व इमारती प्रकल्पांकरीता भूसंपादनाबाबत सक्त अंमलबजावणीचे आदेश व त्यांचे पालन न झाल्यास संबंधितांवर करण्याची शिस्तभंग कारवाई.**

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक :- भूभाडे-२०१९/प्र.क्र.१७४/रस्ते-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ डिसेंबर २०१९.

<u>पूर्व पिठिका-</u>

सार्वजनिक बांधकाम विभागातर्फे प्रामुख्याने प्रमुख जिल्हा मार्ग, राज्य महामार्ग आणि राष्ट्रीय महामार्गावरील रस्ते पूल आनुषंगिक अन्य कामे, तसेच विभागाकडून निवासी व अनिवासी इमारतींसाठी विभागाची तसेच अन्य विभागाची इमारतीची कामे कार्यान्वीत केली जातात. या व्यतिरिक्त सार्वजनिक बांधकाम विभागाकडून रोप वे, विमानाची धाव पट्टी व तात्पुरत्या स्वरुपात बांधावयाची अथवा कायमस्वरुपी हेलिपॅड इत्यादी कामे सुध्दा केली जातात. या सर्व सार्वजनिक प्रयोजनांसाठी शासकीय जमीन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मालकीच्या जमिनीवर काम होणे अभिप्रेत आहे. तसेच ते नसल्यास ज्या विभागाची इमारत आहे अथवा ज्या विभागाने काम आदेशित केलेले आहे त्या विभागाच्या मालकीची जमीन उपलब्ध असणे अभिप्रेत आहे. या व्यतिरिक्त जिल्हाधिकारी, जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी व अन्य निरनिराळया स्वरुपाच्या शासकीय प्राधिकरणांचे आयुक्त अथवा संचालक यांचेकडून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिकाऱ्यांना ठेव स्वरुपामध्ये अथवा शासकीय वित्त विभागाच्या शासकीय आर्थिक अर्थप्रणालीवर काल मर्यादित निधी उपलब्ध करुन दिला जातो. या निधीतून निरनिराळया स्वरुपाची लोकोपयोगी व सार्वजनिक प्रयोजनासाठीची कामे करताना या सर्व छोटया मोठया कामांच्या बांधकामासाठी आवश्यक असणारी जमीन ही शासकीय मालकीची असणे अभिप्रेत आहे.

तथापि, क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त होणारे निरनिराळे संदर्भ पाहता शासनाच्या निदर्शनास आले आहे की, प्रशासकीय मान्यतेचे अंदाजपत्रक तयार करताना कामासाठी आवश्यक जमीन शासकीय मालकीची आहे किंवा कसे, याची शहानिशा केली जात नाही. क्षेत्रिय स्तरावर शाखा अभियंता / उपविभागीय अभियंता/ कार्यकारी अभियंता/ अधीक्षक अभियंता आणि मुख्य अभियंता या दर्जाचे अत्यंत सक्षम प्राधिकारी असूनही मूळ प्रशासकीय मान्यतेची वास्तविक अंदाजपत्रके तयार करताना शासकीय जमीन उपलब्ध असल्यासच अंदाजपत्रक तयार करावे, असे शासनाचे स्पष्ट आदेश असूनही या आदेशांचे वारंवार उल्लंघन केले जात आहे. परिणामी भूसंपादनाविषयीचे निरनिराळे दावे उपलब्ध होवून कोटयवधी रुपयांचा भूर्दंड शासनास सोसावा लागत आहे. काही प्रकरणात तर जमिनीची आवश्यकता नसतानाही भूसंपादनाचे प्रस्ताव सादर करण्यात येतात आणि तद्नंतर त्या जमिनीचा वापरही सार्वजनिक बांधकाम विभाग करु शकत नाही, असेही निदर्शनास आले आहे. अशा सर्व प्रकरणी सार्वजनिक बांधकाम विभागाला निर्णय घेताना अत्यंत अवघड परिस्थितीला सामोरे जावे लागत आहे.

बऱ्याचदा भूसंपादन अधिनियम आणि भूसंपादनाविषयी महसूल विभागाने तयार केलेले निरनिराळे प्रचलित नियम यामुळे भूसंपादनाचा खर्च मोठया प्रमाणावर वाढलेला दिसतो. तसेच काही न्यायालयीन प्रकरणामध्ये दीर्घ विलंब होऊन मोठया प्रमाणावर व्याजाचा बोजाही शासनास सहन करावा लागतो. किमान २५ ते ३० प्रकरणामध्ये शासनास ही बाब क्षेत्रिय स्तरावरुन कळविण्यास झालेल्या विलंबामुळे योग्य वेळेत आर्थिक तरतूद उपलब्ध होउा शकली नाही तर शासकीय मालमत्तेची जप्ती आणि त्यांचे वॉरंट निघण्याची शक्यता निर्माण होते, असे निदर्शनास आले आहे. तसेच काही प्रादेशिक विभागातील प्रकरणामध्ये न्यायालयाचा अवमान होऊन अशा अवमान याचिकेसही सामोरे जावे लागले आहे.

यामुळे या सर्व प्रकरणांवर सखोल अभ्यास करुन खालील सक्त सूचना शाखा अभियंता ते मुख्य अभियंत्यांपर्यंतच्या सर्व अधिकाऱ्यांसाठी देण्यात येत आहेत. या सूचनांचा अवमान झाल्यास, ज्या स्तरावर तो झालेला आहे त्याची सकृतदर्शनी पडताळणी करुन कुठलीही विभागीय चौकशी न करता वरील सूचनांचा भंग केला आहे, असे समजून संबंधित अभियंत्यावर तात्काळ निलंबन/ शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल याची नोंद सर्व अभियंत्यांनी घ्यावी व नोंद घेतल्याची लेखी पोच कार्यासन अधिकारी, रस्ते-७, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन यांचेकडे लिखित स्वरुपात पाठवावी.

**सूचना-**

१. सार्वजनिक बांधकाम विभागातील अधिकाऱ्यांनी त्यांना विभागाने अथवा जिल्हाधिकारी कार्यालयाने किंवा अन्य यंत्रणानी शासकीय मान्यतेकरीता नकाशे व अंदाजपत्रके मागितल्यास प्रथमत: ज्या ठिकाणी काम करावयाचे आहे, ती जागा सार्वजनिक प्रयोजनाकरीता संबंधित प्राधिकरणाने राखून ठेवलेली आहे, तसेच ती सा.बां.विभाग किंवा शासनाच्या मालकीची आहे याची खात्री करावी. जमिनीची मालकी शासनाची असल्यास व संबंधित विभागाने परवानगी दिलेली असल्यासच, प्रशासकीय मान्यता प्राप्त करण्याकरीता अंदाजपत्रक तयार करावे.

२. बऱ्याचदा २५१५या लेखाशिर्षांतर्गत किंवा जिल्हाधिकारी यांचे मार्फत राबविण्यात येणाऱ्या जिल्हा नियोजन समिती (डी.पी.सी) वा अन्य ठेव योजना, यामध्ये तांत्रिक मंजूरी देऊन नंतर ती अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी जिल्हाधिकारी यांचेकडे पाठविण्यात येतात. ही सर्व कामे बहुतांश ठिकाणी प्रमुख जिल्हा मार्ग किंवा राज्य मार्ग यांचेशी निगडीत नसतात. अशी सर्व कामे ग्रामीण मार्ग अथवा अन्य नागरी मार्ग यावर करावयाची असल्यास ज्या ठिकाणी काम करावयाचे आहे, अशा ठिकाणची जी जमीन ही जिल्हाधिकाऱ्यांनी नियुक्त केलेल्या संबंधित परिरक्षण व दुरुस्तीच्या अभिकरणाच्या ताब्यात आहे की नाही, याची खात्री तांत्रिक मंजूरी देणाऱ्या अधिकाऱ्याने करावी . तांत्रिक मंजूरी देण्याचे प्राधिकार उप अभियंता, कार्यकारी अभियंता, अधीक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांना आहेत. त्यामुळे अंदाजपत्रके सादर करताना ज्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने अंदाजपत्रके सादर होईल त्या अधिकाऱ्याची काम करण्याची जागा शासकीय मालकीची आहे की नाही याची खात्री करणे ही जबाबदारी राहील. **तांत्रिक मंजूरी देणाऱ्या अधिकाऱ्याची ही जबाबदारी राहील, की त्याने तांत्रिक मंजूरी देताना शासकीय जमिनीवरच संबंधित काम करण्यात येईल हे तपासावे आणि तसे तांत्रिक मंजूरीच्या आदेशात**

**विविक्षीतपणे नमूद करावे. असे प्रमाणपत्र सोबत असल्याशिवाय सक्षम अधिकाऱ्याने दिलेली तांत्रिक मंजूरी व प्रशासकीय मान्यतेचे अंदाजपत्रक वैध अंदाजपत्रक मानण्यात येणार नाही.**

३. रस्त्याचे, पूलांचे, इमारतींचे व अन्य संस्थांनी सोपविलेली कोणतेही कामे खाजगी जमिनीवर करावयाची असल्यास, जोपर्यंत त्या जमिनीचे भूसंपादन विहित प्रक्रीयेनुसार किंवा महसूल विभागाने विहीत केलेल्या प्रक्रियेनुसार भूसंपादन होऊन संबंधित व्यक्तींना त्याचा मोबदला अदा होत नाही आणि लिखित स्वरुपात जमीन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अथवा सक्षम प्राधिकरणाच्या नावावर ७/१२ व प्रॉपर्टी कार्ड यावर नोंद होत नाही तोपर्यत तांत्रिक मंजूरी देऊ नये. अशी तांत्रिक मंजूरी दिल्यास ती वैध राहणार नाही व परिणामी भूसंपादनाच्या निरनिराळया भविष्यात होणाऱ्या दाव्यांसाठी संबंधित अधिकारी वैयक्तिकरित्या जबाबदार राहतील. प्रशासकीय मंजूरी व तांत्रिक मंजूरीचे अंदाजपत्रकच चुकीचे केल्यास त्याची सर्व जबाबदारी ही संबंधित क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील याची प्रकर्षाने नोंद घ्यावी.

४. यापूर्वीच दिलेल्या सूचनेमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या कुठल्याही कामासाठी यापुढे भूसंपादन करावयाचे असल्यास भूसंपादनाची स्वतंत्र बाब अर्थसंकल्पात समाविष्ट करावी व भूसंपादन पूर्ण झाल्यानंतरच त्यावर करावयाच्या मुख्य कामाची जसे की, इमारत/ रस्ता/ पूल यांचे सविस्तर नकाशे व अंदाजपत्रक तयार करुन ते शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करावे. कोणत्याही परिस्थितीत जमिनीचा आगाऊ ताबा घेऊन खाजगी जमिनीवर शासकीय काम करण्यात येऊ नये.

५. जिल्हाधिकारी अथवा संबंधित यंत्रणांनी किंवा जिल्ह्यातील लोकप्रतिनिधी असा आग्रह धरल्यास ज्या जमिनीवर काम करावयाचे आहे, त्या सर्व जमीन मालकाकडून सार्वजनिक प्रयोजनासाठी संबंधित जमीन विनामूल्य सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करुन घेण्यात यावी. तसेच जमीन विनामूल्य खरेदीचे खरेदीपत्रक संबंधित उप निबंधकाकडे (अशा खरेदीपत्रकास स्टँपडयूटी माफ असल्याने निरंक स्टँपडयूटी लावून) असे खरेदीपत्रक संबंधित उपनिबंधकाकडे नोंदणीकृत करुन घ्यावे. व तद्नंतर त्या जमिनी जिल्हाधिकारी /सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा महाराष्ट्र शासन यांच्या नावे फेरफार करुन नोंदणीकृत करुन घ्यावे व तद्नंतरच अशा शासन मालकीच्या जमिनीवर पुढील काम करण्यात यावे.

६. शासनाने अर्थसंकल्पात भूसंपादनाचे काम समाविष्ट केल्यावर भूसंपादन प्रक्रीया ही महसूल विभागाकडून राबवून घ्यावी व भूसंपादन प्रक्रियेमध्ये संपूर्ण मोबदला अदा करुन, तसेच संबंधितांची मोबदल्याविषयी कुठलीही काहीही तक्रार नाही, असे लिखित स्वरुपात नमूद करुन घेवून प्रकरण अंतिम करुन महसूल यंत्रणेमार्फत संबंधित भूधारकास संपूर्ण मोबदला विनातक्रार अदा करुन जमीन ताब्यात घ्यावी. जमीन ताब्यात घेताना जमिनीचा ७/१२ व प्रॉपर्टी कार्ड यावर सार्वजनिक बांधकाम विभागाचे नाव लागेल, याची दक्षता क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी घ्यावी. भूसंपादन प्रकरणांमध्ये काही ठिकाणी जमीन धारक जमीन उपलब्ध करुन देण्यास इच्छूक नसल्यास अशा ठिकाणी सक्तीचे भूसंपादन करावयाचे झाल्यास रस्ते, पूल, इमारतींचे बांधकाम त्या ठिकाणी करण्याऐवजी अन्य ठिकाणी रस्ता वळवून करता येईल किंवा कसे, हे तपासावे. अन्यथा अशा प्रकरणी न्यायालयीन प्रकरणे होऊन मोठया प्रमाणावर वाढीव खर्च आणि व्याज शासनास द्यावे लागते. त्यामुळे ज्या ठिकाणी रस्त्यासाठी, पूलांसाठी किंवा इमारतीसाठी

संबंधित भूधारक तयार नसतील अशा ठिकाणी काम करणे टाळावे. अशा ठिकाणी रस्त्याची पर्यायी संरचना तयार करावी व त्यावर काम करण्याच्या दृष्टीने प्रयत्न करावे.

७. मात्र वरील सर्व खबरदारी घेऊनही खाजगी जमिनीचे भूमालक /भूधारक इच्छूक नसतानाही ती जमीन ताब्यात घेऊन हे काम करणे , हे शासनाच्या हिताचे व अनिवार्य असेल तर अशा ठिकाणी काम करण्यापूर्वी विहीत प्रक्रियेनुसार भूसंपादन प्रक्रिया पूर्ण पार पाडावी. तत्संबंधातील निवाडा जाहीर होऊन त्याप्रमाणे निवाड्याची रक्कम शासनाकडून उपलब्ध करुन घेऊन महसूल यंत्रणेकडे जमा करावी व महसूल यंत्रणेमार्फत संबंधित भूधारकाचे समुपदेशन करुन न्यायालयीन प्रकरणे पुन्हा होणार नाही, याची दक्षता घ्यावी. मात्र अशा पध्दतीने भूसंपादन करताना न्यायालयीन प्रकरणे उद्भवल्यास अथवा संबंधित व्यक्ती न्यायालयात गेल्यास त्या प्रकरणी शासनाची बाजू सक्षमपणे मांडण्याच्या दृष्टीने क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी त्याबाबत तात्काळ शासनास अवगत करावे. आजकाल whats app, e mail व अन्य संपर्काची साधने उपलब्ध आहेत. (संबंधीत शाखा अभियंता यांनी सर्व वरिष्ठ अभियंत्याकडे संपर्क साधून अशा न्यायालयीन प्रकरणामध्ये सर्व अभियंत्यांनी पुढाकार घेऊन ते प्रकरण लवकरात लवकर संपुष्टात येईल आणि शासनास कमीतकमी खर्च येईल, असे पहावे.) अशा ठिकाणी आवश्यकता असल्यास सरकारी वकिलांचा योग्य तो सल्ला व मदत घ्यावी. ती मिळत नसल्यास विधी व न्याय विभागाने नियुक्त केलेल्या विशेष समुपदेशींच्या शासन निर्णयातील निरनिराळ्या विधी सल्लागाराची सेवा विहीत फीसह घ्यावी आणि न्यायालयीन प्रकरणी प्रकर्षाने लढून शासनाचे नुकसान होणार नाही , असे पहावे. या मध्ये मोठया प्रमाणावर अधिकाऱ्यांची सर्वांची शक्ती व वेळ वाया जातो म्हणून पुन:श्च आदेशीत करण्यात येत आहे की , कोणत्याही परिस्थितीत खाजगी जमिनीचे भूसंपादन करताना संबंधित व्यक्ती भूसंपादनासाठी अनुत्सुक असल्यास अन्य जागेचा पर्याय शोधून त्याचे भूसंपादन करुन रस्ते /पूल/ इमारती बांधणे हाच इष्ट पर्याय राहील. सद्यस्थितीत चालू असलेल्या परिस्थितीत प्रकरणांमध्ये कार्यकारी अभियंता आणि अधीक्षक अभियंता स्तरावर आता यापुढे जबाबदारी निश्चित करण्यात येईल व ज्या मंडळामध्ये असा वाढीव खर्च येईल, त्या मंडळाच्या कारभाराची संपूर्ण छाननी करुन कोणत्या स्तरावर दिरंगाई झालेली आहे, याची जबाबदारी निश्चित करण्यात येईल, याची नोंद घ्यावी

८. विभागीय कार्यालय आणि मंडळ कार्यालय यासंदर्भात स्वतंत्र कार्यासन निर्माण करुन (क्षेत्रिय स्तरावर यासाठी रिक्त जागांमुळे कर्मचारी उपलब्ध नसतील तर कंत्राटी डाटा एंट्री ऑपरेटरच्या सेवा उपलब्ध करुन घेवून) याची स्वतंत्र इलेक्ट्रॉनिक डिजिटल नोंदवही तयार करण्यात यावी. सदर नोंदवही दर महिन्यास तिच्या गोषवाऱ्यासह कार्यासन अधिकारी, रस्ते-७, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या इमेल आयडी dord७.pwd@maharashtra.gov.in वर दर महिन्यास सादर करण्यात यावी. हा मेल का. अ, रस्ते-७ यांनी वाचला आहे किंवा नाही, याची खात्री अधीक्षक अभियंता यांनी दूरध्वनी वरुन अथवा दूरसंदेश करून करावी. तसेच अशी खात्री केल्याचे अभिलेख स्वत:कडे ठेवावेत. या नोंदी च्या आधारे शासन स्तरावरुन दर महिन्याच्या शेवटच्या सप्ताहातील चौथ्या शुक्रवारी प्रकरणनिहाय आढावा घेण्यात येईल आणि कोणत्या प्रकरणात काय कार्यवाही करावयाची आहे, या संदर्भातील सूचना दूरध्वनी/मेल/व्हीसी द्वारे शासन स्तरावरुन सचिव (रस्ते), सचिव (बांधकामे) अथवा संबंधित उप सचिव आणि ते उपस्थित नसल्यास कार्यासन अधिकारी, रस्ते-७ हे देतील.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२०३१२५२०७४११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29, serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d568094459d7ff8219a1f968860a431f89, cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2019.12.03 12:56:09 +05'30'

**(चंद्रशेखर जोशी)**

**सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी अग्रेषित-**

१. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव (महसूल),म.व.व.विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२
३. अपर मुख्य सचिव (नियोजन),नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२
४. अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
५. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
६. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
७. सर्व विभागीय आयुक्त, प्रादेशिक विभाग
८. सर्व मुख्य अभियंता सा.बां.प्रा.विभाग
९. सर्व जिल्हाधिकारी
१०.सर्व सह/उप/ अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई
११.सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे
१२.सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
१३.निवडनस्ती (रस्ते-७)